**एकात्मिक बाल विकास सेवा योजना ( आहार खर्च) हया केंद्र पुरस्कृत योजनेसाठी सन २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात मंजूर केलेल्या पुरवणी मागणीतील तरतूदीपैकी उर्वरित ३०% तरतूद वितरित व खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.१६९/का.५**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :- (१) वित्त विभाग,परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८
(२) शासन निर्णय क्रमांक एबावि-२०१८ /प्र.क्र. १६९ /का.५, दिनांक ७ सप्टेंबर,२०१८.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) (लेखाशिर्ष केंद्र हिस्सा २२३६-१९२७ व राज्य हिस्सा २२३६-१९३६ ) ही केंद्रपुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. या योजनेकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ५० : ५० असे ठरविण्यात आले आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्यातील १०४ नागरी व ४४९ ग्रामीण प्रकल्पातील ० ते ३ व ३ ते ६ वर्षातील बालक, कमी वजनाची बालके, गरोदर व स्तनदा माता या लाभार्थ्यांना गरम ताजा आहार व THR आहारावरील खर्चाकरीता महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०१८ च्या दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनात रु.५००.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. यानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) याखाली केंद्र हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९२७) रु.२५०.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा ५०% (लेखाशिर्ष २२३६१९३६) रु.२५०.०० कोटी असा एकूण रु.५००.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीन्वये उपलब्ध करुन दिला आहे. यापैकी ७०% म्हणजेच रु.३५०.०० कोटी इतका निधी उपरोक्त वाचा क्रमांक (२),दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता या पुरवणी मागणीतील उर्वरित ३०% म्हणजेच रु.१५०.०० कोटी इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) या कार्यक्रमाखाली महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०१८ च्या दुसऱ्या (पावसाळी) अधिवेशनात मंजूर करण्यात आलेल्या रु.५००.०० कोटी निधीपैकी उर्वरित केंद्र हिस्सा ३०% (लेखाशिर्ष २२३६-१९२७ ) रु. ७५.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा २०% (लेखाशिर्ष २२३६-१९३६) रु.७५.०० कोटी असे एकूण रु. १५०.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे पन्नास कोटी फक्त) इतकी तरतूद आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. या शासन निर्णयान्वये पुरक पोषणांतर्गत आहार खर्च या कार्यक्रमासाठी उपरोक्तप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात आलेला एकूण रु. १५०.०० कोटी इतका निधी हा गरम ताजा आहार व THR यासाठी समप्रमाणात वितरीत करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकान्वये निर्गमीत केलेल्या सूचनांनुसार तसेच वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३७ / २०१९/व्यय-६, दिनांक १४ फेब्रुवारी २०१९ नुसार देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२१५१५५३५५६४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2019.02.15 15:55:58 +05'30'

**( ला. रा. गुजर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे उप मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री/राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधानपरिषद), विधानभवन,मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य, मंत्रालय, मुंबई-३२
६. सचिव (महिला व बालविकास विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई.
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
११. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास.
१२. सर्व महिला व बाल विकास अधिकारी, (जिल्हा परिषद).
१३. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी) प्रकल्प.
१४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२)/ वित्त विभाग (व्यय-६) मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना कळविण्यात येते की, त्यांनी एकात्मिक बाल विकास सेवा योजना (आहार खर्च) केंद्र हिस्सा ३०% (लेखाशिर्ष २२३६-१९२७) रु. ७५.०० कोटी व समरुप राज्य हिस्सा ३०% (लेखाशिर्ष २२३६-१९३६) रु.७५.०० कोटी म्हणजेच रु.१५०.०० कोटी इतका निधि आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांना BDS प्रणालीवर निधी वितरीत करावा.
२०. निवड नस्ती कार्या-५, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.